केंद्र शासनाकडून प्रधानमंत्री आवास योजनेतंर्गत कोकण मंडळास निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृहनिर्माण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रआयो.२०१७/प्र.क्र.४०/गृनिधो-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक- २७ मार्च, २०१७.

**वाचा** - १) केंद्र शासनाचे पत्र क्र. I-१४०११/१५/२०१६-HFA-४(FTS-१५२५५) दि.२९.९.२०१६.
२) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे क्र.मुअ-२/उमुअ/काअ-१/प्रआयो/प्रा./नस्ती क्र.७२/३६८/१७/दि.२४.३.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना** -

प्रधानमंत्री आवास योजनेतंर्गत राज्यातील एकूण १३ शहरांकरिता रु.३७१.५८ कोटी इतका निधी केंद्र शासनाकडून संदर्भीय क्र.१ वरील दि.२९.९.२०१६ च्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे. सदर निधी राज्याचा एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. यापैकी ३२७.१८६ इतका निधी कोकण मंडळातील ११ प्रकल्पांकरिता मंजूर करण्यात आला असून त्यापैकी १६४.९७६ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

प्रधानमंत्री आवास योजनेतंर्गत केंद्र शासनाने प्राप्त झालेल्या रु.३७१.५८ कोटी निधीपैकी कोकण मंडळातील खालील विवरणपत्रात दर्शविलेल्या एकूण ४२३८४ घरकुलांकरिता प्रमाणे रु.२५४.३७६ कोटी इतका निधी प्राप्त झाला असून त्यापैकी कोकण मंडळाने मागणी केलेल्या एकूण २७४९६ घरकुलांकरिता रु.१६४.६९ कोटी इतका निधी राज्यस्तरीय मान्यता व संनियंत्रण समिती व केंद्रीय मान्यता व संनियंत्रण समिती यांनी नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून सुकाणू अभिकरणास (म्हाडा) निधी वितरीत करण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्रकल्पाचे नांव | मंजूर घरकुलांची संख्या | केंद्र शासनाचा पहिला हप्ता (४०%) रु.कोटी | मागणी केलेल्या घरकुलांची संख्या | केंद्र शासनाचा पहिला हप्ता (४०%) रु.कोटी |
|---|---|---|---|---|---|
| १ | मौजे,बारवे ता.कल्याण, जि.ठाणे | ११४८ | ६.८८८ | ८३४ | ५.००४ |
| २ | मौजे,भंडार्ली,जि.ठाणे | १८०४ | १०.८२४ | १७७२ | १०.६३२ |
| ३ | मौजे, भंडार्ली,जि.ठाणे | ६३८० | ३८.२८ | ६४८ | ३.८८८ |
| ४ | मौजे, गोठेघर,जि.ठाणे | ३८२२ | २२.९३२ | ३४८४ | २०.९०४ |

| अ. क्र. | प्रकल्पाचे नांव | मंजूर घरकुलांची संख्या | केंद्र शासनाचा पहिला हप्ता (४०%) रु.कोटी | मागणी केलेल्या घरकुलांची संख्या | केंद्र शासनाचा पहिला हप्ता (४०%) रु.कोटी |
|---|---|---|---|---|---|
| ५ | मौजे,खोणी,ता.कल्याण, जि.ठाणे | ६३८० | ३८.२८० | ७१५० | ४२.९० |
| ६ | मौजे-शिरढोण, ता.कल्याण,जि.ठाणे | २२८६२ | १३७.१७२ | १३६०८ | ८१.६४८ |
| | एकूण | ४२३८४ | २५४.३७६ | २७४९६ | १६४.९७६ |

२. सदर निधीच्या उपयोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सुकाणू अभिकरणास सादर करण्याची दक्षता संबंधित मंडळानी घ्यावी.

या प्रयोजनावर होणारा खर्च मागणी क्रमांक क्यू-३, मुख्य लेखाशीर्ष २२१६ , गृहनिर्माण, ८०-सर्वसाधारण, १०३ गृहनिर्माण मंडळे इत्यादींना सहाय्य (०८) सर्वासाठी घरे (०८) (०१) सर्वासाठी घरे-अंमलबजावणी यंत्रणा सहायक अनुदाने केंद्र हिस्सा (६०%) (२२१६ २९९६) ३१ सहायक अनुदाने (वेतनत्तर) या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. वरील शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.२० एप्रिल,२०१६ च्या परिपत्रकातील दिलेल्या सूचनानुसार व प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. प्रस्तुत प्रकरणी वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.२० एप्रिल,२०१६ मध्ये परिच्छेद क्र.७ ते १८ मधील अटींची व परिशिष्टातील क्र. ९ मध्ये तपासणी सूचीतील अटींची पूर्तता होत आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७११४२४३८६०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarjerao Shankar Jagdale

Digitally signed by Sarjerao Shankar Jagdale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sarjerao Shankar Jagdale
Date: 2017.03.27 11:44:24 +05'30'

**( स शं.जगदाळे )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन (पत्राने)
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

५. मा.विरोधी पक्षनेता,महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
९. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)मुंबई/नागपूर.
१०.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११.उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३ कार्यासन) मंत्रालय, मुंबई-३२.
१२.सह सचिव, भारत सरकार, गृहनिर्माण व शहरी दारिद्रय निर्मूलन मंत्रालय, निर्माण भवन, नवी दिल्ली ११० ०११.(नोंदणीकृत डाकेने)
१३.सह संचालक, लेखा व कोषागरे, कॉम्पुटर सेल,नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालय समोर, मुंबई-३२.
१४.मुख्याधिकारी, कोकण गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, मुंबई-५१.
१५.निवडनस्ती, गृहनिर्माण विभाग,गृनिधो-२.